आदिवासी क्षेत्र उपयोजना / आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१६-१७ अंतर्गत नागरी आदिवासी वस्ती सुधारणा योजनेंतर्गत **लेखाशिर्ष (२२१७ १२५९)** खाली निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र.क्र.०७ /कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - २२ मार्च, २०१७.

<u>वाचा -</u>

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) नगर विकास विभागाचा शासन निर्णय क्र-आवसू-१००६/प्र.क्र.८०/नवि-४ दि.०६.०२.२००७
४) नगर विकास विभागाची नस्ती क्र. एव्हीवाय- १९१६ / प्र.क्र. १९४ / नवि- ०४

## शासन निर्णय-

मागणी क्र. टी-५, २२१७- नगर विकास , पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०- सर्वसाधारण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०२) शहरी भागाची आदिवासी वस्ती सुधारणा, २२१७ १२५९, ३१- सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता मध्ये **रु. ७००.०० लक्ष** अर्थसंकल्पित करण्यात आलेले आहेत.

उपरोक्त अर्थसंकल्पित रकमेपैकी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर अर्थसंकल्पित रकमेच्या ८० % प्रमाणात **रु. ५६०.०० लक्ष** इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला असून या योजनेंतर्गत **नंदूरबार- रु. २४१.०० लक्ष , तळोदा- रु.७२.०० लक्ष, डहाणू- रु. १८७.०० लक्ष व नवापूर- रु.६०.०० लक्ष या चार आदिवासी उपयोजना क्षेत्रातील नगरपरिषदांना एकूण रु. ५६०.०० लक्ष** याप्रमाणे मागणी क्र. टी-५, २२१७- नगर विकास , पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०- सर्वसाधारण, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०२) शहरी भागाची आदिवासी वस्ती सुधारणा, २२१७ १२५९, ३१- सहायक अनुदाने **या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या वर्षात अर्थसंकल्पित रु.५६०.०० लाख ( रुपये पाच कोटी साठ लाख फक्त )** इतका निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी <u>मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च</u> करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. **आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी**. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, नगर विकास विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

६. सदर निधीसाठी वाचा क्र. ३ मधील तरतूदीचे पालन करण्याची जबाबदारी नगर विकास विभागाची राहील.

७. सदर शासनादेश **वाचा** येथील क्रमांक १ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.४.२०१६. अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारांस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२११७४२३३६४२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.22 12:45:50 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई .
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७.विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१०.वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

११.नगर विकास विभाग, नवि-३४, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१२. कार्यासन अधिकारी, कार्यासन- १७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.